**मा. राज्यपाल यांना सादर करावयाच्या मासिक अहवालाबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र-जीओव्ही-२०११/प्र.क्र.२१०/सात,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ सप्टेंबर,२०११

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. जीओव्ही-१०९५/१५३/सात, दि. ७ डिसेंबर,१९९५चे अर्धशासकीय पत्र
२) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. जीओव्ही-२००८/७८/सात, दि. २४ जून,२००८चे अर्धशासकीय पत्र
३) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. जीओव्ही-२००९/प्र.क्र.१९/सात, दि.६ फेब्रुवारी,२००९ चे अर्धशासकीय पत्र
४) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. जीओव्ही-२०१०/(६)/प्र.क्र११९/सात, दि.१६ऑगस्ट,२०१० चे पत्र
५) सामान्य प्रशासन विभागाचे क्र. जीओव्ही-२०१०/प्र.क्र.१७१/सात, दि.२१ ऑक्टोवर,२०१० चे अर्धशासकीय पत्र

**परिपत्रक**

मा. राज्यपाल यांना सादर करावयाचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ३ तारखेपर्यंत सामान्य प्रशासन विभागास पाठविण्याबाबत वरील संदर्भाधिन पत्रान्वये वेळोवेळी सर्व मंत्रालयीन विभागांना सुचना देण्यात आलेल्या आहेत.

२. राज्यातील घडामोडींचा मासिक अहवाल मा. राज्यपाल महोदय यांचेकडून मा. राष्ट्रपती महोदयांना दरमहा सादर करण्यात येतो. त्याकरीता राज्यातील ठळक घडामोडीबाबत संदर्भाधीन अ.क्र.४ येथील दि.१६/०८/२०१० च्या पत्रान्वये विहित केलेल्या विवरणपत्रात शासनाच्या विविध प्रशासकीय विभागाकडून प्राप्त होणारा अहवाल मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने मा. राज्यपाल यांच्या कार्यालयाकडे पुढील कार्यवाहीसाठी प्रत्येक महिन्यात पाठविण्यात येतो. सदर अहवालात खालील मुद्यांचा देखील समावेश करुन अहवाल सादर करण्याबाबतचे आदेश मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेले आहेत.

अ) विभागाचे योजनांतर्गत Budget किती आहे, त्यामध्ये उपलब्ध करुन दिलेला मासिक निधी, झालेला खर्च नमूद करावा.

(पृ.आ.प.)

ब) विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या फ्लॅगशिप योजना व २० कलमी कार्यक्रमांचा संक्षिप्त प्रगती अहवाल.

क) प्रत्येक विभागामध्ये निश्चित केलेल्या KRA बाबतची माहिती.

ड) अहवाल सादर करण्यात येणाऱ्या महिन्यामध्ये काही विशेष उल्लेखनीय घटना असल्यास त्यासंबंधीची माहिती.

ई) गृह विभागाची मागील महिन्यामध्ये घडलेल्या गुन्ह्यांबाबतची, मागील वर्षाच्या त्या महिन्यातील संबंधित महिन्याशी तुलनात्मक माहिती व पोलीस आधुनिकीकरणाबाबत संक्षिप्त प्रगती अहवाल.

३. वरील परिच्छेदातील "अ" व "ब" मधील विषयाबाबतच्या माहितीचे सनियंत्रण नियोजन विभागात होत असल्याने **नियोजन विभागाने** सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांची एकत्रित संक्षिप्त माहिती मराठी व इंग्रजीमध्ये सामान्य प्रशासन विभागास दरमहा ३ तारखेपूर्वी सादर करावी, असे निर्देशित करण्यात येत आहे.

४. परिच्छेद क्र.२ मधील "क" "ड" व "इ" बाबतची माहिती मराठी व इंग्रजीमध्ये सदर अहवालासोबत सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी दरमहा ३ तारखेपूर्वी सामान्य प्रशासन विभागास पाठवावी, असे निर्देशित करण्यात येत आहे.

५. वरील प्रमाणे पाठवावयाची माहिती सप्टेंबर, २०११ या महिन्यापासून नियमितपणे विहित मुदतीत पाठवावी. **अहवालातील इंग्रजीमधील माहिती A-4 पेपर साईज, Font Size-13, Lotus Wordpro-Times New Roman मध्ये पाठवावी.**

६. हे परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०११०९१२११३३३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रत्नाकर गायकवाड

**( रत्नाकर गायकवाड )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव / उप सचिव-आस्थापना, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन-सात)